हंगाम २०१६-१७ मध्ये किमान आधारभूत किंमत खरेदी योजनेअंतर्गत खरेदी केलेल्या धानाची भरडाई करण्याकरिता केंद्र शासनाचे भरडाई दराव्यतिरिक्त अतिरिक्त ₹.३०/- एवढा दर राज्य शासनाकडून मंजूर करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग
## शासन निर्णय क्रमांकः धानभ-१२१६/प्र.क्र.२५९/नापु-२९

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय (विस्तार), मुंबई-४०० ०३२
दिनांक : २१ जून, २०१७

वाचा : १) शासन निर्णय, क्र. खरेदी १११५/प्र.क्र.१७/नापु-२९, दि.१४.०१.२०१६
२) शासन निर्णय, क्र.खरेदी १०१६/प्र.क्र.२०५/नापु-२९, दि.१९.१०.२०१६

**प्रस्तावना :-**

किमान आधारभूत किंमत खरेदी योजना ही केंद्र शासनाची योजना असून ती शेतकऱ्यांच्या हितासाठी आहे. या योजनेअंतर्गत केंद्र शासन निरनिराळया पिकांच्या किमान आधारभूत किंमती जाहीर करते. सदर किमान आधारभूत किंमतीचा लाभ होण्याच्या दृष्टीने शेतकऱ्यांना हमी किंमतीपेक्षा कमी किंमतीने (डीस्ट्रेस सेल) धान्य विकावे लागू नये, म्हणून राज्य शासनातर्फे धान्याची ( एफ. ए. क्यू. धान व भरडधान्य ) खरेदी करण्यात येतो. महाराष्ट्र राज्यात केंद्र शासनाची "नोडल एजन्सी" म्हणून भारतीय अन्न महामंडळ काम पहाते तर भारतीय अन्न महामंडळाच्या वतीने महाराष्ट्र राज्यात किमान आधारभूत किंमत खरेदी योजनेची अंमलबजावणी राज्य शासन मान्यताप्राप्त अभिकर्ता संस्थेमार्फत करते. सदर योजनेअंतर्गत खरेदी केलेल्या धानाची भरडाई अभिकर्ता संस्थांमार्फत मिलर्सकडून करुन घेऊन प्राप्त होणारा सीएमआर (तांदूळ) भारतीय अन्न महामंडळाकडे जमा करण्यात येत होता. हंगाम २०१६-१७ पासून केंद्र शासनाच्या निर्देशानुसार राज्यात “विकेंद्रित खरेदी योजना” राबविण्याचा निर्णय शासनाने संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयान्वये घेतला आहे. त्यानुसार सदर हंगामापासून धानाची भरडाई करुन प्राप्त सीएमआर सार्वजनिक वितरण व्यवस्थेकरिता उपलब्ध असलेल्या वाहतूक कंत्राटदारामार्फत शासकीय गोदामात जमा करण्यात येतो.

किमान आधारभूत किंमत खरेदी योजनेसाठी येणाऱ्या खर्चाची प्रतिपूर्ती केंद्र शासनाच्या वतीने भारतीय अन्न महामंडळामार्फत करण्यात येते. हंगाम २०१६-१७ करीता केंद्र शासनाने तात्पुरते अनुषंगिक खर्च मंजूर केले आहेत. त्यानुसार धान भरडाईकरिता कच्च्या तांदळासाठी रु.१०/- (वाहतूकीचा खर्च वगळून) व उकडा तांदळासाठी रू.२०/- प्रति क्विंटल असा दर निर्धारित केला आहे. सदर दरात हंगाम २००५-०६ पासून केंद्र शासनाने सुधारणा केलेली नाही.

राज्यातील मिलर्सनी छत्तीसगड/मध्यप्रदेश या राज्याप्रमाणे वाहतूक दर / भरडाई दर वाढविण्याची विनंती केली आहे. सदर विनंती विचारात घेवून, हंगाम २०१५-१६ करिता केंद्र शासनाने प्रति क्विं. रु.१०/- मंजूर केलेल्या भरडाई दराव्यतिरिक्त राज्य शासनाने प्रति क्विं.अतिरिक्त रु.३०/- असे एकुण रू.४०/- इतका वाढील भरडाई दर मंजूर केल्यामुळे धान भरडाईचे प्रमाण वाढले होते. त्याच धर्तीवर हंगाम २०१६-१७ या हंगामाकरिता वरीलप्रमाणे राज्य शासनाचे अतिरिक्त प्रति क्विं.₹ .३०/- इतके वाढीव भरडाई दर मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

हंगाम २०१६-१७ मध्ये किमान आधारभूत किंमत खरेदी योजनेअंतर्गत अभिकर्ता संस्थेमार्फत खरेदी केलेल्या धानाची भरडाई करण्याकरिता केंद्र शासनाने मंजूर केलेल्या भरडाई दराव्यतिरिक्त राज्य शासनाकडून अतिरिक्त भरडाई दर मंजूर करण्याबाबत शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

१. हंगाम २०१६-१७ या हंगामामध्ये किमान आधारभूत किंमत खरेदी योजनेअंतर्गत खरेदी केलेल्या धानाच्या भरडाईसाठी केंद्र शासनाने रु.१०/- प्रति क्विंटल इतका मंजूर केलेल्या भरडाई दराव्यतिरिक्त राज्य शासनाकडून रु.३०/- प्रति क्विंटल (कच्च्या तांदूळासाठी) इतका वाढीव दर असे एकूण रु.४०/- प्रति क्विंटल इतक्या वाढीव भरडाई दरास याव्दारे मंजूरी देण्यात येत आहे.
२. हंगाम २०१६-१७ मध्ये खरेदी केलेल्या धानाच्या भरडाईसाठी होणाऱ्या रु.२१ कोटी इतक्या वरील वाढीव भरडाई दराच्या खर्चास मान्यता देण्यात येत आहे.
३. प्रस्तुतचा खर्च प्रचलित पध्दतीनुसार विभागाच्या स्वीय प्रपंची लेख्यातून (PLA) भागविण्यास मान्यता देण्यात येत आहे.

उपरोक्त शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.अनौसं १८३/२०१७/व्यय-४, दिनांक २१.४ .२०१७ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे..

उक्त शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०७०११५३१४२३६०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Satish Shridhar Supe

Digitally signed by Satish Shridhar Supe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Food Civil Supplies And Consumer Protection Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f7773ccec10687b16ba0f2d3f7f9e6f87fe68f9b1b2cb5b73b75bab952ca0621, cn=Satish Shridhar Supe
Date: 2017.07.01 15:28:10 +05'30'

**( सतिश सुपे )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव.

२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३. मा. मंत्री, अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव.
४. मा. मंत्री, वित्त यांचे खाजगी सचिव.
५. मा. मंत्री, पणन यांचे खाजगी सचिव.
६. मा. मंत्री, आदिवासी विकास, यांचे खाजगी सचिव.
७. मा.विरोधी पक्ष नेता (विधान परिषद/विधानसभा यांचे खाजगी सचिव.)
८. मा. राज्यमंत्री, अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण, यांचे खाजगी सचिव.
९. मा. सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
१०. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय,मुंबई.
११. अपर मुख्य सचिव, (वित्त) महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
१२. प्रधान सचिव, अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग.
१३. अपर मुख्य सचिव, कृषि व प.दु.म. विभाग, मंत्रालय, मुंबई,
१४. अपर मुख्य सचिव ( पणन ), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय,मुंबई.
१५. अपर मुख्य सचिव, महसूल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई.
१६. प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय,मुंबई.
१७. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र स्टेट को.ऑप.मार्केटिंग फेडरेशन लि., कनमूर हाऊस,नरसी नाथा स्ट्रीट,मुंबई- ४०० ००९,
१८. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ, आदिवासी विकास भवन, २ रा माळा, राम गणेश गडकरी चौक, जुना आग्रा रोड,नाशिक-२,
१९. सर्व विभागीय आयुक्त.
२०. नियंत्रक (शिधावाटप) व संचालक नागरी पुरवठा(गो/वा),मुंबई,
२१. सर्व जिल्हाधिकारी,
२२. सर्व उप आयुक्त (पुरवठा),
२३. सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी,
२४. सर्व अन्नधान्य वितरण अधिकारी,
२५. वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई,
२६. उप संचालक, नागरी पुरवठा, पुरवठा आयुक्त कार्यालय, मुंबई.
२७. सर्व उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी,अ.ना.पु.व ग्रा.सं.विभाग, मंत्रालय विस्तार, मुंबई,
२८. सर व्यवस्थापक,(महा.) भारतीय अन्न महामंडळ, ५ वा माळा, राजेंद्र नगर, दत्तपाडा रोड, बोरीवली पूर्व मुंबई-४०० ०६६.
२९. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई ( ५ प्रती ),
३०. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,ग्रंथालय ६ वा मजला,विधान भवन,मुंबई. (१०प्रती)
३१. मान्यताप्राप्त राजकीय पक्षांची कार्यालये, ( प्रत्येकी ५ प्रती ),
३२. निवड नस्ती (नापु-२९).